**मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या योजने अंतर्गत Sensitization Training and Capacity Building या बाबीस मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पीएडब्ल्यू- ०३२२/प्र.क्र.९०/विशा-६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १४ मार्च, २०२२.

**वाचा:-**

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९ (भाग-४)/विशा-६, दिनांक १४.०५.२०२१.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीएडब्ल्यू-१११७/प्र.क्र.७१९ /विशा-६, दिनांक ३१.०१.२०१९.
३) मुंबई शहर सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या योजनेच्या अंमलबजावणीकरिता गठीत उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या (HPC) दि. ०५.०१.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
४) पोलीस सह आयुक्त (गुन्हे), मुंबई यांचे दि. १४.०२.२०२२ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या केंद्र आणि राज्य शासन पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीस दिनांक ३१.०१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर योजने अंतर्गत केंद्र शासनाने रु. २५२ कोटी इतक्या निधीस मान्यता दिलेली असून या योजनेच्या निधीमध्ये केंद्र शासन व राज्य शासनाचा हिस्सा अनुक्रमे ६०:४० असा आहे. सदर योजने अंतर्गत रु. १४७.४८ कोटी च्या यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदीकरिता दिनांक १४.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. दिनांक १४.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील ब) क्षमता विकास (Capacity Building) अन्वये अ. क्र. १३ येथे Sensitization Training and Capacity Building या बाबीकरिता प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या योजनेच्या अंमबजावणी करिता गठीत शक्ती प्रदत्त समितीची (High Power Committee) बैठक मा. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०५.०१.२०२२ रोजी आयोजित करण्यात आली होती. शक्ती प्रदत्त समितीच्या (High Power Committee) दिनांक ०५.०१.२०२२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या योजनेच्या आराखड्यातील Sensitization Training and Capacity Building या घटकाच्या (Component) अंमलबजावणी करिता महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांना मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने, मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत Sensitization Training and Capacity Building या घटकाच्या (Component) अंमलबजावणी करिता महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांना मान्यता देण्याबाबत आणि त्याकरिता रु. ८.०० कोटी एवढा निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजना (निर्भया) या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत Sensitization Training and Capacity Building या घटकाच्या (Component) अंमलबजावणी करिता महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांना मान्यता देण्यात येत आहे. तसेच याकरिता खाली नमूद केल्याप्रमाणे रु. ८.०० कोटी एवढा निधी वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | बाब | लेखाशिर्ष ४०५५०२८८, निर्भया निधी अंतर्गत केंद्र हिस्सा (६०%) (रक्कम रुपये कोटी) | लेखाशिर्ष ४०५५०२९७, निर्भया निधी अंतर्गत राज्य हिस्सा (४०%) (रक्कम रुपये कोटी) | एकूण रक्कम (रुपये कोटी) |
|---|---|---|---|---|
| १. | Sensitization Training and Capacity Building | ४.८० | ३.२० | ८.०० |

२. सदर प्रयोजनासाठी या लेखाशिर्षांतर्गत प्राप्त होणारा निधी खर्च करण्यासाठी अपर पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी, गुन्हे कोष, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. मुंबई शहर महिला सुरक्षितता पुढाकार योजनेच्या (निर्भया) अंमलबजावणी बाबत गृह मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे तसेच, यंत्रसामग्री / साधनसामग्री खरेदी करण्याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करावे.

४. केंद्र शासनाच्या गृह विभागामार्फत वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग / खर्च हा केंद्र / राज्य शासनाच्या प्रचलित नियमानुसार विहीत पध्दतीने येणा-या किमतीनुसार व लेखाशिर्षनिहाय विहीत करण्यात आलेल्या एकूण वित्तीय मर्यादेच्या अधीन राहून व यासंदर्भातील वित्तीय औपचारीकता पूर्ण करून करण्यात यावा.

५. कोणत्याही परिस्थितीत प्राप्त निधी संचित (parking) स्वरूपात ठेऊ नये. यानुषंगाने प्राप्त निधीचा विनियोग झाल्यानंतर विहीत कालावधीत योग्य त्या विवरणपत्रात उपयोगिता प्रमाणपत्र (utilization certificate) सादर करावे. प्रस्तुत योजनेचे प्राधिकारी म्हणून केंद्रशासनाच्या आवश्यकतेनुसार अंतर्गत लेखापरीक्षणासाठी यासंदर्भातील लेखे अद्ययावत ठेवण्यात यावे.

६. सदर खर्च हा, गृह विभाग, मागणी क्र. बी-१०, ४०५५-पोलीसांवरील भांडवली खर्च, ००, २०७ राज्य पोलीस (दत्तमत), (००) (१३) ४०५५०२८८ निर्भया निधी अंतर्गत केंद्र हिस्सा (६०%) अंतर्गत आणि मागणी क्र. बी-१०, ४०५५-पोलीसांवरील भांडवली खर्च, ००, २०७ राज्य पोलीस (दत्तमत), (००) (१४) ४०५५०२९७ राज्य हिस्सा (४०%) लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या चालू आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदींतून करण्यात यावा.

७. सदरहू शासन निर्णय हा वित्त विभागाने शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१, दिनांक २९ जुलै, २०२१, दिनांक १४ आक्टोबर, २०२१ आणि दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशांस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१४१४५११५९७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL EKNATH KULKARNI

Digitally signed by ANIL EKNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a68ace8f470aec5d6a18e832ae4a8b4d7804aba280ecdb8c3db114bd3cb1c2ac, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=04A7B4319163F6C965DD5CCDF92A74288C731F37328C1327B237008EB8DDC2D4, cn=ANIL EKNATH KULKARNI
Date: 2022.03.14 16:19:46 +05'30'

**(अनिल ए. कुलकर्णी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. अपर मुख्य सचिव (गृह), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष), यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
८. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९. अपर पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. व्यय-७, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अर्थसंकल्प शाखा (बीयूडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (विशा-६).